आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) करीता निधी वितरीत करण्याबाबत.

(राज्य हिस्सा - २५०५ ए१३८)

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय, क्रमांकः बीयुडी-२०२२/प्र.क्र.०८/कार्यासन ६**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- **२१** फेब्रुवारी,२०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ व दि.०८.०२.२०२३.

२) आ.वि.वि. शा.नि.क्र.बीयुडी-२०२२/प्र.क्र.८/कार्यासन-६, दि.२०.०६.२०२२ व दि.२८.१२.२०२२.

३) ग्राम विकास विभागाची नस्ती क्र.प्रआयो-२०२२/प्र.क्र.७७/यो-१०.

**प्रस्तावना :-**

ग्राम विकास विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) या योजनेंतर्गत सन २०२०-२१ व सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी रु.२२५९१.०० लाख इतका केंद्र हिस्सा प्राप्त झाला आहे. त्यास अनुसरुन समरुप राज्य हिस्सा रु.१५०६०.६६६६७ लाख इतका निधी वितरीत करणे आवश्यक आहे. संदर्भाधीन क्र.२ येथील दि.२८.१२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये केंद्र हिस्सा रु.२२५९१.०० लाख व समरुप राज्य हिस्सा रु.२४०४.८६ लाख असा एकूण रु.२४९९५.८६ लाख इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

महाराष्ट्र विधानमंडळाच्या माहे डिसेंबर, २०२३ या हिवाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेला रु.२७७१६.४७ लाख इतक्या निधीतून या योजनेसाठी प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्यास समरुप राज्य हिश्श्याचा उर्वरीत निधी वितरीत करण्यासाठी रु.१२६५५.८०७ लाख इतका निधी सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पित तरतुदींतून वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र.३ अन्वये वित्त विभागास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष, २५०५- ग्रामीण रोजगार या मुख्य लेखाशीर्षाखाली केंद्र पुरस्कृत “प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत” अनुसूचित जमाती घटकाकरीता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींमधून राज्य हिस्सा रु.१२६५५.८०७ लाख इतका निधी खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व राज्य हिस्सा | बाब | सन २०२२-२३ मधील अर्थसंकल्पित तरतूद (मुळ+पुरवणी) | यापूर्वी वितरीत निधी | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) | २५०५ ए१३८ राज्य हिस्सा (४० टक्के) | ३३, अर्थसहाय्य | ५२७१६.४७ | २५०००.०० | १२६५५.८०७ |
| | **एकूण** | | **५२७१६.४७** | **२५०००.००** | **१२६५५.८०७** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.१२६५५.८०७ लाख (अक्षरी रुपये एकशे सव्वीस कोटी पंचावन्न लाख ऐंशी हजार सातशे फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून अप्पर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०४.०४.२०२२ व दि.०८.०२.२०२३ च्या शासन परिपत्रकांतील आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.९६-२०२३/व्यय-१४, दि.०८.०२.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२०१२४२३२०१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.02.22 15:48:34 +05'30'

**(राजेंद्र दे.भवारी)**

**कार्यसन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग (ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती)
५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. सर्व प्रकल्प अधिकारी (ए.आ.वि.प्र.)
८. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.ग्रामविकास विभाग, योजना-१०, मंत्रालय, मुंबई.
१२.कार्यासन अधिकारी, (का.०८)
१३.निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.